**अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या नगर विकास विभागातील (नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभाग) अधिकारी / कर्मचारी अधिसंख्य पदावर वर्ग करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- जापप्र-४५१९/प्र.क्र.१९०/नवि-२७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
चौथा मजला, मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
**दिनांक:- १८ नोव्हेंबर, २०२१.**

वाचा: १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९.
२) संचालक, नगर रचना,पुणे यांचे पत्र क्र.आस्था/अनु.जमाती/प्रशा-१/४९६३, दिनांक २८.१०.२०२१.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २८.१०.२०२१.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये, अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करुन त्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार, नगर विकास विभागाच्या अधिनस्त असणाऱ्या नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभागातील श्री.सुमित उत्तम झोडगे यांच्याकरीता अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या रचना सहायक संवर्गातील अधिकाऱ्याकरीता संबंधित कार्यालयाच्या आस्थापनेवर या शासन निर्णयान्वये १ अधिसंख्य पद निर्माण करुन त्यांची सेवा **विवरणपत्र-१** प्रमाणे वर्ग करण्यात येत आहे.

२. अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणाऱ्या अधिकारी / कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत असून, संबंधित नियुक्ती अधिकाऱ्याने करावयाच्या नियुक्त्या तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्याच्या कालावधीसाठी किंवा संबंधित अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफाशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत अस्तित्वात राहतील.

३. सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद केलेल्या अधिकाऱ्याची अधिसंख्य पदावर सेवा या शासन निर्णयाच्या दिनांकापासून वर्ग करण्यात येत आहे.

४. अधिसंख्य पदाच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित अधिकारी सध्या ज्या कार्यालयात कार्यरत आहेत त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०२११११८१६५७०२३०२५** असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2021.11.18 17:22:16 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर.
२) अध्यक्ष, राज्यस्तरीय निवड समिती तथा संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) संचालक, नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
५) सह सचिव, वित्त विभाग,कार्यासन आपुक,मंत्रालय,मुंबई.
६) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन १६-ब),मंत्रालय,मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, ---------
१०) संबंधित अधिकारी / कर्मचारी. (संचालक, नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभाग,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे मार्फत )
११) निवड नस्ती,नवि-२७.

**जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या, अन्य मागासवर्ग जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या, तसेच जात वैधता प्रमाणपत्राबाबत न्यायालयीन प्रकरणे प्रलंबित असलेले अधिकारी/कर्मचारी**

**“विवरणपत्र-१”**

| अ. क्र. | अधिकारी / कर्मचाऱ्यांचे नांव | सध्याचे पदनाम | मूळ नियुक्तीचा दिनांक | मूळ नियुक्ती झालेले पद | नियुक्तीचा मार्ग | सेवानिवृत्तीचा दिनांक | जात प्रवर्गाची सद्य:स्थिती | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **अ) नियुक्ती प्राधिकारी : संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.** | | | | | | | | |
| १. | श्री.सुमित उत्तम झोडगे | ----- | २८.०८.२०१२ | रचना सहायक | सरळसेवा | ३१.१२.२०४९ | अ.ज. (अप्राप्त) | ---- |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2021.11.18 17:22:41 +05'30'

(विजय चौधरी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

----------X----------